2011031521375500l

# महाराष्ट्र शासन
# GOVERNMENT OF MAHARASHTRA

Telephone: 022-22876155 / 22844222
Fax No. 022-22020717

www.maharashtra.gov.in

क्रमांक : संकीर्ण १०११/प्र. क्र. २२/ कोषा-प्र-५
No.
वित्त विभाग,
Finance Department
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
Mantralaya Annexe, Mumbai - 400 032.
दिनांक :११ मार्च, २०११

मार्च प्राथम्य / तात्काळ

प्रति,

१) सर्व अ. मु. स. / प्र. स. / सचिव, मंत्रालयीन सर्व विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.

२) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई

३) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे / मुंबई

४) सर्व कोषागार अधिकारी

विषय:- आर्थिक वर्षाअखेर सर्व मंत्रालयीन विभाग व कोषागारांनी पाळावयाच्या सूचना.

महोदय,

अर्थसंकल्पिय तरतूद नियोजनबध्द पध्दतीने (Monthly Cash Flow) वर्षभरात खर्च होणे अपेक्षित आहे. तथापी, शेवटच्या क्षणी निधी व्यपगत होऊ नये व कोषागाराकडे सादर होणाऱ्या देयकांची गर्दी टाळावी यासाठी खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. वित्त विभागाची सहमती प्राप्त झालेल्या अनुदानाचे वितरण बीम्स प्रणालीमार्फत त्याच दिवशी संबंधीत विभागाकडून क्षेत्रीय अधिकाऱ्यांना करण्यात यावे.

२. दिनांक ३१/०३/२०११ रोजी रात्री ८:०० वाजेपर्यंत अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई व जिल्हा कोषागार कार्यालयात देयके स्विकारण्यात येतील. तसेच उप कोषागारातून प्रदान आदेशाद्वारे बँकेतून प्रदान होत असल्याने तसेच बँकांच्या कामकाजाची वेळ विचारात घेऊन कोकण भवन उप कोषागार वगळता अन्य उप कोषागारात सायंकाळी ०६:०० वाजेपर्यंतच देयके स्विकारली जातील. त्याचप्रमाणे आक्षेप लावून परत केलेल्या देयकांसंदर्भातही वरील वेळेचे बंधन राहील. या अनुषंगाने सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुखांना वरील वेळेच्या आत देयके सादर करण्याबाबत स्पष्ट सूचना देण्यात याव्यात. वरील वेळेनंतर कोणत्याही प्रकारची देयके कोषागारातून स्विकारली जाणार नाहीत. तसेच त्यामुळे एखाद्या विभागाचा निधी व्यपगत झाल्यास त्याची जबाबदारी संबंधीत विभागावर राहील.

३. सर्व देयके अर्थसंकल्प अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीद्वारे काढलेल्या प्राधिकारपत्रासह सादर करणे आवश्यक आहे.

[illegible]. सर्व प्रशासकीय विभागांनी तसेच अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई व कोषागार कार्यालयांनी वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

आपला,

(राजेश अग्रवाल)
सचिव (लेखा व कोषागारे)

प्रत: उचित कार्यवाहीसाठी अग्रेषित --
सर्व सह / उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.